GR-200404171253070001-0100

**पदोन्नती**

**लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदावर पदोन्नतीने नेमणुका करण्यासंबंधीचे प्रस्ताव आयोगाकडे संदर्भित करण्यासंबंधीच प्रपत्र.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
**शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२००३/मुसं.३१/प्र.क्र.१७/०३/१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ६ ऑक्टोबर, २००३.**

वाचा :- १) शासन परिपत्रक,क्रमांक : पीएससी-१०७०-ड, दिनांक २५ सप्टेंबर,१९७०.
२) शासन परिपत्रक ,क्रमांकःपीएससी-१२८३९/४४८०/ड, दि.१० सप्टेंबर, १९७०.
३) शासन परिपत्रक, क्रमांकः एसआरव्ही-१०८४/३२९७/प्र.क्र.५४०/८४/१२, दि.१५ एप्रिल, १९८६.
४) शासन परिपत्रक, क्रमांकः मलोआ-मुस-४८/प्र.क्र.६५/९३/८, दि.३० डिसेंबर, १९९३.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदांवर पदोन्नतीने नियुक्ती करण्याचे अथवा पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करण्याचे प्रस्ताव मंत्रालयीन विभागाकडून आयोगाकडे सहमतीसाठी कसे पाठवावयाचे याबाबतच्या सूचना वरील परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. तरीही, लोकसेवा आयोगाने शासनाच्या असे निदर्शनास आणले आहे की, प्रस्ताव विहित प्रपत्रात न पाठविणे,प्रस्तावात समावेश असलेल्या अधिका-यांपैकी काही अधिका-यांचे गोपनीय अभिलेख उपलब्ध करुन न देणे, निम्न पदाची ज्येष्ठता यादी व सेवा प्रवेश नियमाची प्रत न पुरविणे इत्यादी तसेच प्रस्तावासंदर्भात शासनाकडून मागविलेली माहिती/संबंधित कागदपत्रे या ना त्या कारणासाठी आयोगास पुरविण्यास टाळाटाळ करणे इत्यादी स्वरुपाच्या अनियमतता शासनाच्या संबंधित विभागाकडून घडत आहेत. तसेच न्यायालयीन प्रकरणात, संबंधित विभाग ते प्रकरण आयोगाकडेच प्रलंबित असल्याचे सांगून नामानिराळे होतात. परिणामी न्यायालयाच्या टिकाटिप्पणीला नाहकपणे आयोगाला सामोरे जावे लागते. परिणामी यापुढे असे परिपूर्ण नसलेले प्रस्ताव प्राथमिक छाननी अंती शासनास परत करण्यात येतील असा आयोगाने निर्णय घेतला आहे.

सदर आयोगाचा निर्णय सर्व मंत्रालयीन विभागांच्या निदर्शनास आणण्यात येत आहे. तसेच सर्व मंत्रालयीन विभागांना पुन्हा सुचित करण्यात येते की, यापुढे आयोगाला निवडसूच्यांना मान्यता देण्याचे प्रस्ताव पाठवितांना सोबतच्या **तपासणीसूचीनुसार** सर्व माहिती दिली जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच असे प्रस्ताव आयोगाला पाठवितांना वर नमूद केलेल्या दिनांक १०.९.१९७० च्या परिपत्रकातील सूचनांनुसार सर्व संबंधित अधिका-यांचे संबंधित वर्षाचे गापेनीय अहवाल आयोगास प्रस्तावासोबत पाठविले जातील याचीही दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्र. कृ. लोखंडे**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
सर्व मंत्रालयीन विभाग (१० प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-२००३/मुस-१७/०३/बारा, दिनांक ६ ऑक्टोंबर, २००३ चे सहपत्र.

## निवडसूचीच्या प्रस्तावाबाबत आवश्यक असणारी तपासणी सुची

(१) शासन परिपत्रक क्र. -पीएससी-१०७०-ड, दिनांक १५ एप्रिल, १९८६ सोबतच्या प्रपत्रातील माहिती.

१. विभागाचे नाव --

२. ज्या पदावर पदोन्नती करावयाची त्याचा तपशील --

(अ) पदनाम --

(ब) कोठल्या सेवेत व वर्गात अंतर्भूत --

(क) वेतनश्रेणी --

(ड) भरावयाच्या पदांची संख्या --

(इ) मागासवर्गीयांसाठी आरक्षण असल्यास त्याबाबत तपशील ---

(ई) सेवा प्रवेश नियम विहित केले असल्यास त्यांची प्रत सोबत पाठविली आहे काय ?

३. ज्यांना पदोन्नती द्यावयाची प्रस्तावित आहे ते अधिकारी सेवा प्रवेश नियमातील पदोन्नतीच्या अटी पूर्ण करतात काय?

४. विचाराधीन अधिका-यांचे मूळ गोपनीय अभिलेख सोबत पाठविले आहेत काय? व ते अद्ययावत आहेत काय?

५. विचाराधीन अधिका-यांची ज्येष्ठतासूची सोबत पाठविली आहे काय ? अधिक्रमण प्रस्तावित असल्यास त्याचे समर्थन सोबत पाठविले आहे काय ?

६. निम्न पद (म्हणजे ज्या पदावर पदोन्नती देण्यात आली किंवा द्यावयाची आहे, त्याच्या खालचे पद) आयोगाच्या कक्षेत असल्यास त्या पदावरील नेमणूकीस आयोगाने मान्यता दिली होती काय व केव्हा ? (आयोगाच्या संबंधित पत्राचा क्रमांक व दिनांक नमूद करावा.)

७. प्रस्तावित निवडसूचीची प्रत सोबत पाठविली आहे काय ?

(२) प्रस्तावास सामान्य प्रशासन विभागाची सहमती.

(३) विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

(४) मागासवर्गीयांचे प्रवर्गनिहाय आरक्षण, मागील अनुशेष, वापरलेली बिंदूनामावली.

(५) मागील निवडसूची करिता वापरलेली बिंदू नामावली.

(६) विचारक्षेत्रात येणा-या अधिका-यांची यादी.

(७) ज्या अधिका-यांना त्वरित बढतीस्थान देण्याचे प्रस्तावित असेल त्यांची नावे.

***______***